अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई शहर यांच्या अधिपत्याखालील कुलाबा एक्साईज स्टेशन येथील विभागीय कार्यालयाचे थकीत भाडे अदा करण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**

**गृह विभाग.**

शासन निर्णय क्र.एमआयएस १००९/प्र.क्र.२५३/इएक्ससी-४

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.** दिनांक : १५ सप्टेंबर, २००९.

वाचा :-

१) शासन निर्णय गृह विभाग क्र.एमआयएस ०७०६/रेंट/ प्र.क्र.१६५/इएक्ससी-४, दि. २२ एप्रिल, २००९.

२) विनियोजन अधिनियम, २००९ (सन २००९ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. १३) शासन राजपत्र असाधारण भाग-४, दि. २०.०६.२००९.

**शासन निर्णयः-** मा. न्यायालयाच्या आदेशानुसार मेसर्स ओरिएन्टल इन्शुरन्स कंपनी मर्यादित यांस रु.१२,००,०००/- इतकी भाड्याच्या रकमेची थकबाकी देणे आवश्यक होते. परंतु केलेली तरतूद अपुरी असल्याने व हा खर्च तातडीच्या स्वरुपाचा असल्याने, या खर्चास विधानमंडळाची अधिकृत मंजूरी मिळेपर्यंत, शासकीय ज्ञापन, वित्त विभाग क्र. आकनि-११.०९/०४/ अर्थसंकल्प-११, दि.२१/०४/२००९ अन्वये आकस्मिकता निधीतून रु.१२,००,०००/- (रुपये बारा लक्ष) इतकी आगाऊ रक्कम काढण्यात आली व तिच्या विनियोगासंबधीचे आदेश संदर्भिय क्र.१ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित करण्यात आले. आकस्मिकता निधीतून काढलेल्या आगाऊ रकमेची भरपाई करण्यासाठी व हा खर्च विधानमंडळाच्या निदर्शनास आणून देण्यासाठी रु.१२,००,०००/- (अनावर्ती) चे पूरक विनियोजन विधानमंडळाच्या जून, २००९ च्या (पावसाळी) अतिरिक्त अर्थसंकल्पिय अधिवेशनात सादर केले होते.

२.	उपरोक्त रू.१२,००,०००/- (रू.१२ लक्ष फक्त) इतकी तरतूद विभागाच्या कार्यात्मक शिर्षाखाली पूरक मागणी क्र. बी-२, मुख्य लेखाशिर्ष २०३९-राज्य उत्पादन शुल्क, (००)००१) संचालन व प्रशासन, (०२) (०१) आस्थापना निरीक्षण व प्रतिबंधक, (२०३९००२३) (भारित), ५० इतर खर्च या उपशिर्षाखाली बाब क्र. ३६ नुसार पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेली आहे.

३.	तथापि, मा. न्यायालयाच्या आदेशानुसार भाडयाच्या थकबाकीपोटी भरावयाची रक्कम रू.१२,००,०००/- (रू.१२ लक्ष फक्त) ही मेसर्स ओरिएन्टल इन्शुरन्स कंपनी मर्यादित यांस यापूर्वीच आकस्मिकता निधीतून अग्रिमाद्वारे अदा करण्यात आलेली आहे. आता यासाठी पुरवणी मागणीद्वारे निधी मंजूर करण्यात आलेला असल्याने सदरचा खर्च आकस्मिकता निधीच्या खर्च खाती न टाकता वर नमूद मागणी क्रमांकाखाली दर्शविण्यास मान्यता देण्यात येत आहे.

४.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २००९०९१५१७५६५६००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

( प्र. मु. काकड )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर
सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई. (२ प्रती)
आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
अधिदान व लेखाअधिकारी, मुंबई,
निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, मुंबई शहर
वित्त विभाग (अर्थसंकल्प-३, अर्थसंकल्प-११, व्यय-८) /संगणक समन्वय शाखा
निवडनस्ती (इएक्ससी-४)